**अनुसूचित जातीच्या मुलामुलींना परदेशात शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्याबाबत.**
**विद्यार्थ्यांची निवड करणे सन २०१०-११.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ डिसेंबर,२०१०

**वाचा :-** १) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००३/प्र.क्र.११५/मावक - २, दिनांक ११.६.२००३
२) शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ५.८.२००४
३) शासन निर्णय सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक १७.६.२००६
४) शासन शुध्दीपत्र सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००६/प्र.क्र.३२९/मावक - २, दिनांक २०.६.२००६
५) शासन निर्णय सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.७.२०१०
६) शासन शुध्दीपत्र सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक - २, दिनांक ११.७.२०१०,११.८.२०१० व २८.१०.२०१०
७) शासन निर्णय सामाजिक न्याय, व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक - २, दिनांक २७.१०.२०१०

**प्रस्तावना :-** शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इबीसी-२००३/प्र.क्र.११५/मावक-२, दिनांक ११.६.२००३ व शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २००४/प्र.क्र.१०२/मावक - २, दिनांक ५.८.२००४ नुसार अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना परदेशात शिक्षणाची संधी मिळावी व त्यांच्या गुणवत्तेला वाव मिळावा म्हणून विविध विषयांमध्ये परदेशातील नामांकित विद्यापीठातील विविध विद्याशाखेत ज्या विद्यार्थ्यांना प्रवेश मिळेल अशा १० विद्यार्थ्यांना परदेश शिष्यवृत्ती मंजूर करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. अनुसूचित जातीमधील जास्तीत जास्त विद्यार्थ्यांना परदेशात उच्च घेण्याची संधी उपलब्ध व्हावी यासाठी उपरोक्त दि.१७.६.२००६ च्या शासन निर्णयानुसार सन २००६-०७ या वर्षापासून १० विद्यार्थ्यांवरुन २५ विद्यार्थी संख्या वाढ करण्यात आलेली आहे. २५ विद्यार्थी संख्या करताना कला, विज्ञान व वाणिज्य शाखेतील पदवी व पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी जागा राखीव ठेवण्यात आल्या होत्या शासन निर्णय क्रमांक इबीसी २००९/प्र.क्र १०३/मावक २ दिनांक २२.१०.२०१० अन्वये सन २०१०-११ या वर्षापासून २५ विद्यार्थ्यांवरुन ५० विद्यार्थी संख्या वाढ करण्यात आलेली आहे ५० विद्यार्थी संख्या दर्जेदार पदव्युत्तर पदवी व डॉक्टरेट अभ्यासक्रम विशेष प्राविण्य मिळविण्याच्या दृष्टीने तसेच इतर देशातील नविन क्षेत्रामध्ये सुरु असलेल्या संशोधनाचा उपयोग करुन घेण्याच्या दृष्टीने अभ्यासक्रमासाठी देण्यात येणा-या शिष्यवृत्तीमध्ये सुधारणा करुन सुधारित नियमावली शासन

निर्णय दिनांक १५.७.२०१० व शासन शुध्दीपत्रक दिनांक १०.८.२०१० अन्वये लागू करण्यात आलेली आहे इबीसी २००९/प्र.क्र १०३/मावक-२ दिनांक २२.१०.२०१० अन्वये त्यानुसार पदव्युत्तर पदवी व डॉक्टरेट अभ्यासक्रमासाठी ५० विद्यार्थ्यांना खालीलप्रमाणे विद्या शाखानिहाय शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे निश्चित करण्यात आलेले आहे :-

| अ क्र | शाखा | पदव्युत्तर पदवी | डॉक्टरेट |
|---|---|---|---|
| १ | कला | - | **१०** |
| २ | वाणिज्य | - | **४** |
| ३ | विज्ञान | - | **६** |
| ४ | व्यवस्थापन (Management) | ८ | - |
| ५ | अभियांत्रिकी | **१०** | ४ |
| ६ | वैद्यकीय | ८ | - |
| | **एकूण** | २६ | **२४** |

वरीलप्रमाणे परदेशातील नामांकित विद्यापीठातील विविध शाखांमध्ये सन २०१०-११ मध्ये प्रवेश मिळालेल्या २५ विद्यार्थ्यांना परदेशात उच्च शिक्षणासाठी शिष्यवृत्ती शासन निर्णय दि २७.१०.२०१० अन्वये २५ विद्यार्थ्यांची निवड करण्यात आलेली आहे. उर्वरीत २५ विद्यार्थ्यांची निवड करण्याकरीता नोव्हेंबर २०१० मध्ये जाहिरात देण्यात आली होती.

**शासन निर्णय :-** शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्रमांक : इबीसी २०१०/प्र.क्र.१९४/मावक-२ दिनांक १५.७.२०१० मध्ये नमूद करण्यात आलेल्या निवड समितीची दिनांक १०.१२.२०१० रोजी नागपूर शिबिर कार्यालयात बैठक झाली. सदर समितीस एकूण १५ विद्यार्थी पात्र असल्याचे आढळून आल्यामुळे समितीने १५ विद्यार्थ्यांची शिफारस शासनाकडे केलेली आहे. सदर शिफारशी नुसार निवड केलेल्या १५ विद्यार्थ्यांची यादी सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मध्ये जोडलेली आहे.

**२.** सदरहू विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती प्रदान करण्यासाठी संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. विद्यार्थ्यांची यापुढील वर्षाची शिष्यवृत्ती मंजूर करण्याचे तसेच एखाद्या विद्यापीठाच्या शिक्षण शुल्कामध्ये वाढ किंवा घट होत असल्यास त्याबाबत मंजूरी करण्याचे अधिकार संचालक, समाजकल्याण, पुणे यांना देण्यात येत आहेत.

**३.** ज्या विद्यार्थ्यांना शासनामार्फत शिष्यवृत्ती मंजूर केली आहे, त्या विद्यार्थ्यांनी त्यांचे शिक्षण संपल्यानंतर देशाची सेवा करणे, त्यांच्या ज्ञानाचा फायदा देशाला करुन देणे आवश्यक आहे. या अनुषंगाने संबंधित विद्यार्थ्यांकडून शिष्यवृत्ती मंजूर करण्यापूर्वी **हमीपत्र (BOND)** लिहून घेण्यात यावे.

**४.** परदेशात वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेली संस्था भारतीय आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे. किंवा वैद्यकीय अभ्यासक्रमासाठी परदेशात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनी भारतात पदवी / पद्व्युत्तर पदवी घेऊन परत आल्यानंतर भारतीय

आयुर्विज्ञान परिषद (Indian Medical Council) यांनी अनिवार्य केलेली परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. ती उत्तीर्ण न झाल्यास सर्व रक्कम वसूलपात्र असेल, असे **हमीपत्र** विद्यार्थ्यांकडून घेण्यात यावे.

**५.** परदेशातील पद्व्युत्तर अभ्यासक्रम त्यासाठी असलेल्या विहित कालावधीतच पूर्ण होणे आवश्यक आहे. विद्यार्थ्याने परस्पर विद्यापीठ अथवा अभ्यासक्रम अथवा दोन्हीही बदलल्यास शिष्यवृत्तीची रक्कम संपूर्णतः वसूल करण्यात येईल.

**६.** (अ) ज्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली आहे, त्यांच्या अभ्यासक्रमाच्या एकूण खर्चाच्या रकमेपैकी **प्रथम वर्षाचे** शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च यांची रक्कम संबंधित विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती प्राप्त करुन घेऊन संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी थेट विद्यापीठास अदा करावी.

(ब) त्यानंतरच्या वर्षाचे शुल्क, निर्वाह भत्ता व इतर अनुषंगिक खर्च याबाबत विद्यापीठाकडून प्रमाणित माहिती आणि विद्यार्थ्याच्या प्रगती व उपस्थितीबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घ्यावी. त्यानुसार संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी शासन निर्णयाप्रमाणे संबंधीत वर्षाची अनुज्ञेय शिष्यवृत्ती रक्कम संबंधीत विद्यापीठास अदा करावी.

**७.** याबाबत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक एन-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण, २७७, शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (वि.घ.यो.), (०४) (२३), विदेशात विशेष अध्ययन करण्यासाठी अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना राजर्षि शाहू महाराज शिष्यवृत्ती, (२२२५ ३८३ २), ३४ शिष्यवृत्त्या / विद्यावेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून त्याखाली केलेल्या सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. त्याकरीता संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**८.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०१०१२२८१५५६३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

**( भो.गो.गोंदोळे )**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत,

मा.मुख्यमंत्री यांचे सचिव

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव

मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक

मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे स्वीय सहाय्यक

प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.

महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
निवड नस्ती, मावक-२

## शासन निर्णय क्रमांक इबीसी-२०१०/प्र.क्र.१९४/मावक-२, दिनांक- २८ डिसेंबर,२०१० चे परिशिष्ट-अ

| अ.क्र. | शाखा / अभ्यासक्रम | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यासक्रमाचा कालावधी | पदव्युत्तर परिक्षेतील गुणाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | बी.बी.ए. | श्री.अमोल साहेबराव लोणे | University Bedforeshire Business School U.K | M.Sc. Marketing & Business Management | १८ महिने | ६३.२० |
| २ | हॉटेल ॲडमीनिस्ट्रेशन | श्री.अमित अशोक बनकर | Le Cordon Bleu Australia | Master of International Hospitality Management | २ वर्ष | ६१.०० |
| ३ | बॅचलर होटल मॅनेजमेंट | श्री.अक्षय वसंतराव समुद्रे | Ealing Hammersmith & West London College U.K. | Post Graduate Diploma for Graduate for chefs Culinary Art | २१ महिने | ५७.७२ |
| ४ | बी.एस्सी. | श्री.अमित रमेश साळवे | Harold College U.K | ABP Post Graduate Diploma in Business Mangement | १ वर्ष | ५७.५४ |
| ५ | बी.एस्सी. | श्री.सतिश शिवाजी कांबळे | University Bedforshire U.K. | M.A. International Human Resource Management | १ वर्ष | ५५.५२ |
| ६ | होटल मॅनेजमेंट | श्री.प्रकाश देवचंद जाधव | London School of Management & Science U.K. | Post Graduate Diploma leading to MBA | १८ महिने | ५५.०० |
| ७ | एल.एल एम. | श्री.किशोर दत्ताराम वळंजू | Nottingham University Business School U.K. | M.B.A. | १ वर्ष | ५१.०० |

| अ.क्र. | शाखा / अभ्यासक्रम | विद्यार्थ्याचे नाव | प्रवेश घेतलेल्या विद्यापीठाचे नाव | अभ्यासक्रमाचे नाव | अभ्यासक्रमाचा कालावधी | पदव्युत्तर परिक्षेतील गुणाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | बी.ई.कॉम्प्युटर सायन्स | श्री. आनंद बाबाराव जांभुळकर | Texas Tech. University Graduate School U.S.A. | Master of Science | २ वर्ष | ७१.०० |
| ९ | बी.ई | श्री.पंकज नानाजी खडसे | Kingston University London U.K. | M.Sc. In Advanced product & Desing Engg. | १ वर्ष | ६६.०५ |
| १० | बी.ई मॅकनिक | श्री आशिष श्रीनिवास तुपलोंढे | New Castle University U.K. | M.Sc. Mechatronic | १ वर्ष | ६३.२६ |
| ११ | बी.ई | श्री.अमुल म्हस्कु अडागळे | UNC Charlotte The Graduate School U.S. | M.S..Computer Science | २ वर्ष | ६३.०० |
| १२ | बी.पी.ओ. | श्री. शिवसेन चंद्रकांत राऊत | University of Strathclyde Glasgow U.K. | M.Sc.Bio.Engg. | १ वर्ष | ६८.३३ |
| १३ | बी.डी.एस. | डॉ. कुणाल प्रमोदराव मेश्राम | International Technological University U.S.A.. | M.Sc. In Bio Managerment. | ३ वर्ष | ६२.४५ |
| १४ | विधी एल.एल.बी. | श्री. किशोर अप्पा शिंदे | Manchester Metropolitan University U.K. | L.L.M. | २ वर्ष | ५७.०० |
| १५ | बॅचलर ऑफ फाईन आर्ट. | श्री.योगेश संभाजी खंदारे | University of Huddersfield U.K.. | M.A.Graphic Desgin. | १ वर्ष | ५४.८० |